**नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामासाठी निधी वितरणाबाबत. (सन २०१४-१५)**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१४/प्र.क्र.७३६/नापु- १६-ब**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३१ मार्च, २०१५.

वाचा

**१) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१२/१०२४/प्र.क्र.९१/नापु १६-ब, दि. १६ नोव्हेंबर, २०१२.**
**२) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१३/प्र.क्र.४३७/नापु १६-ब, दि. २० मे, २०१३ .**
**३) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१४/प्र.क्र.७३६/नापु १६-ब, दि. २२ मे, २०१४ .**
**४) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१४/प्र.क्र.७३६/नापु १६-ब, दि. २५ ऑगस्ट, २०१४ .**
**५) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१४/प्र.क्र.७३६/नापु १६-ब, दि. १० मार्च, २०१५.**
**६) शासन निर्णय क्रमांकः गोदाबां-१०१४/प्र.क्र.७३६/नापु १६-ब, दि. २७ मार्च, २०१५,**

**प्रस्तावना**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वितरित करावयाच्या धान्याच्या साठवणूकीसाठी पुरेशी गोदाम बांधण्याचा कार्यक्रम शासनाने हाती घेतला आहे. त्याअंतर्गत संदर्भीय शासन निर्णय दिनांक २२ मे, २०१४, २५ ऑगस्ट, २०१४ व १० मार्च, २०१५ अन्वये गोदाम बांधकामांना निधी उपलब्ध करुन दिला आहे. जिल्हा पुरवठा अधिकारी,अहमदनगर यांनी यापैकी रू. २९,६६,११४/- इतका निधी समर्पित करण्यात येत असल्याचे कळविले आहे. सदर निधी दौंड, जि. पुणे येथील गोदाम बांधकामास उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सन २०१४-१५ मध्ये वितरीत केलेल्या निधीपैकी जिल्हा पुरवठा अधिकारी, अहमदनगर यांच्याकडून संगमनेर, जि. अहमदनगर येथील गोदाम बांधकामासाठी वितरीत केलेला निधी रू. २९,६६,११४/- एवढा निधी प्रत्यार्पित करून घेण्यात यावा.सदर निधी प्रशासकीय मान्यतेसंदर्भातील

संबंधित शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून खालीलप्रमाणे काही गोदामासाठीचा निधी अन्य गोदाम बांधकामास उपलब्ध करुन देण्यात येत आहे :

| अ. क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे ठिकाण | क्षमता (मे.टन) | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय यांच्याकडील छाननीअंती मान्य अंदाजित खर्च (रु.) | यापूर्वी उपलब्ध करून दिलेला निधी रू. | सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेला निधी (रु.) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | पुणे | दौंड | दौंड | ३००० | २९०४९४५९ | १८५२४७३० | २९,६६,११४ |
| | | एकूण रुपये एकोणतीस लक्ष सहासष्ट हजार एकशे चौदा फक्त | | | | | |

वरीलप्रमाणे निधी काढून घेऊन संबधित जिल्हा पुरवठा कार्यालयाकडे वळती करण्यासाठी आवश्यक कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव यांचे कडून करण्यात यावी.

उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम ४ मुख्य लेखाशिर्ष '४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्य़क्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१)(०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल) योजनेंतर्गत (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत व सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा

वरीलप्रमाणे निधी उपलब्ध करून दिलेल्या शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने करण्यात येऊन पूर्ण करण्यात यावीत. गोदाम बांधकाम सुरू झाल्यानंतर प्रथम बांधकामाचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित बांधकामाचा दरमहा आढावा घेऊन बांधकामाची प्रगती, जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी शासनास सादर करावी.

सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

बांधकामास विलंब अथवा इतर कारणानी गोदाम बांधकामास वाढीव खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधीत अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वतः भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरीक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

सदरचे आदेश प्राप्त होताच सदरील तरतुद जिल्हाधिकाऱ्यांमार्फत तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित कार्यकारी अभियंता यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात यावी. धनादेशाने आहरीत करण्यात येऊ नये.

सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी ठेव अंशदान म्हणून वर्ग करता येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३११२५७३७१००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pranali Pratap Chavan

Digitally signed by Pranali Pratap Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies & Consumer Protection, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pranali Pratap Chavan
Date: 2015.03.31 13:08:04 +05'30'

**( प्र.प्र.चव्हाण )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उपआयुक्त (पुरवठा), पुणे, नाशिक.

२. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

३. जिल्हाधिकारी, अहमदनगर, पुणे.

४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, नाशिक, पुणे.

५. कार्यकारी अभियंता, अहमदनगर, पुणे.

६. जिल्हा पुरवठा अधिकारी, अहमदनगर, पुणे.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, पुणे.

८. महालेखापाल-१/२, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

९. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उप सचिव यांचेमार्फत)

११. वित्त विभाग (व्यय-४, अर्थबळ, अर्थोपाय व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.

१२. उपमहाव्यवस्थापक, नाबार्ड, ५४, वेलस्ली रोड, शिवाजी नगर, पुणे-५.

१३. निवडनस्ती, नापु १६-ब.

******************